**अचलपूर जि. अमरावती येथे २०० खाटांचे सामान्य रुग्णालय इमारत बांधकामाची प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा- २०१९/ प्र.क्र. २१५ (भाग-१)/ आरोग्य-३**

१० वा मजला, ए विंग ,गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१

दिनांक: ८ मार्च, २०२२

वाचा -

1) **सार्व. आरोग्य विभाग, शा. नि. क्र. प्रशामा-२०१९/प्र.क्र.२१५/आरोग्य-३, दि. १४.०८.२०१९**

**प्रस्तावना**

२०० खाटांचे सामान्य रुग्णालय अचलपूर, जि. अमरावती येथील बांधकामाकरीता उपरोक्त शासन निर्णय दि.१४.०८.२०१९ अन्वये रु.५५.४९ कोटी इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर बांधकाम अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीमधून हाती घेण्यात येणार असून अल्पसंख्याक विकास विभागामार्फत प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही सुरू आहे. सदर प्रशासकीय मान्यता रद्द झाल्याशिवाय त्याच जागेवर नवीन इमारतीच्या प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकास तांत्रिक सहमती देता येणार नाही. त्यामुळे यापूर्वी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

अचलपूर जि. अमरावती येथे २०० खाटांचे इमारत बांधकामाचे रु.६३.१७ कोटीचे अंदाजपत्रक व आराखडे मुख्य अभियंता यांच्या सहीसह प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव अंल्पसंख्याक विकास विभागास सादर करण्यात आला आहे. सबब संदर्भाधिन शासन निर्णयान्वये यापूर्वी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०८१६२२१८७५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2022.03.08 17:38:59 +05'30'

**(रो.दि. कदम-पाटील)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

२. आयुक्त ( आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान , मुंबई.

३. महालेखापाल ( लेखा परीक्षा) / (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

४. संचालक -१, आरोग्य सेवा, मुंबई.

५. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिका बांधकाम विभाग, अमरावती

६. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई

७. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला

८. वैद्यकीय अधिक्षक , उपजिल्हा रुग्णालय अचलपूर

९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती

१०.जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अमरावती

११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२) मंत्रालय, मुंबई

१२.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

१३.निवडनस्ती (आरोग्य -३)